जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्याबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: अस्थायी ०३२५/१२३/प्र. क्र.६०/कार्यासन-११**
पाचवा मजला, मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १३ मार्च, २०२५

वाचा: १. शासन निर्णय वित्त विभाग क्र.असंक १००१/प्र.क्र.२९/२००१,वित्तीय सुधारणा, दि.१०/९/२००१.
२. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग,क्र.अस्थायी ०२२४/प्र. क्र.४७/कार्यासन-११, दि.२०/०९/२०२४
३. शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३/०३/२०२५
४. जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांचे पत्र म. जा. क्र. प्रशा. ब.४/ ५७०/२०२५, दि.२४/०१/२०२५

**प्रस्तावना :-**

जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांच्या आस्थापनेवरील १६० अस्थायी पदांना संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयांन्वये दि. ०१/०९/२०२४ ते दि.२८/०२/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. त्यानंतर जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांच्या आस्थापनेवर कनिष्ठ लिपिकांची ४ पदे व शिपाई यांची ४ पदे अशी एकूण ८ पदे कमी झाली आहेत. त्यामुळे जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांनी एकूण १५२ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची विनंती संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये केली आहे.

संदर्भ क्र. ३ येथील वित्त विभागाच्या दि.०३/०३/२०२५ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतू, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि. ०१/०३/२०२५ ते दि. ३१/०८/२०२५पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांच्या आस्थापनेवरील १५२ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांनी संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये कळविल्यानुसार त्यांच्या आस्थापनेवरील पुढील तक्यात नमूद केलेली १५२ अस्थायी पदे दि.०१/०३/२०२५ ते दि. ३१/०८/२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | अधिक्षक | २ |
| २ | सहायक अधीक्षक | १५ |
| ३ | लघुलेखक ग्रेड -१ | ३ |
| ४ | लघुलेखक ग्रेड-२ | २ |
| ५ | लघुलेखक इंग्रजी ग्रेड-३ | ३ |

| | | |
|---|---|---|
| ६ | लघुलेखक मराठी ग्रेड-३ | १ |
| ७ | वरिष्ठ लिपीक | १५ |
| ८ | कनिष्ठ लिपीक | ५४ |
| ९ | वाहनचालक | २ |
| १० | प्रमुख बेलिफ | १ |
| ११ | बेलिफ | १५ |
| १२ | पुस्तक बांधणीकार | १ |
| १३ | शिपाई | ३२ |
| १४ | वॉचमन | १ |
| १५ | पुर्णवेळ सफाई कामगार | १ |
| १६ | पहारेकरी (कंत्राटी पध्दतीने) | २ |
| १७ | सफाईगार (कंत्राटी पध्दतीने) | २ |
| | **एकूण पदे** | **१५२** |

२. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान, १०५ दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (०२) (०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश (दत्तमत) (अनिवार्य) (२०१४ ०१७२)" या लेखाशिर्षांतर्गत ०१- वेतन खाली सन २०२५-२०२६ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.०३/०३/२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१३१७५०२७७०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=a80fef4908844f3f0e391754221ba7b421d28c86653344150a5e31030c791f4b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7328C41D6A5210C49CCE931861626D508AE4537D7BB43F92AC6D5796595AADB8, cn=HEMANGI AJIT SHETYE
Date: 2025.03.13 17:51:27 +05'30'

**( हेमांगी शेट्ये )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा न्यायालय रत्नागिरी.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
४) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी,
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७) वित्त विभाग, व्यय-५ / आ.पु.कक्ष /अर्थसंकल्प ११,मंत्रालय, मुंबई.
८) विधी व न्याय विभाग, कार्या-२०/कार्या. २३,मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती (कार्यासन ११)